**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(२७)/का-१४११,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. १३ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२.
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी "महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे" व "नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुनःस्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिका/नगरपंचायत/नगरपरिषद)" या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार अनगर नगरपंचायत व मोहोळ नगरपरिषद अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. १५.०० कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा संबंधित नगरपंचायत/नगरपरिषद राहील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन विभाग सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, सोलापूर / कार्यान्वयीन यंत्रणा अनगर नगरपंचायत / मोहोळ नगरपरिषद यांनी संदर्भ क्र. (१) व (४ येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तीचे पालन करावे.

५. सदर कामांवर होणारा खर्च मागणी क्र.ओ-९, मुख्य लेखाशीर्ष-३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, (०१)(०२) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना (नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत) सहायक अनुदान (३६०४ १०१८) (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदान याखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१८५४५६३२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.13 19:04:10 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग,
२. जिल्हाधिकारी, सोलापूर,
३. मुख्याधिकारी, अनगर नगरपंचायत/ मोहोळ नगरपरिषद, जि.सोलापूर,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर,
५. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागारे अधिकारी, सोलापूर,
११. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(२७)/का-१४११, दि.१३/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट अनगर नगरपंचायत, जि.सोलापूर रु.१०.०० कोटी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **अंदाजित रक्कम(रु.लाख)** |
| १ | अनगर नगरपंचायत अंतर्गत रस्ते विकास कामांसाठी | १००० .०० |
| | **एकूण** | **१०००.००** |

| शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(२७)/का-१४११, दि. १३/०३/२०२४ सोबतचे परिशिष्ट, मोहोळ नगरपरिषद, जि.सोलापूर रु.५.०० कोटी | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **अंदाजित रक्कम(रु.लाख)** |
| १ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील बाभूळगाव रोड ते कुरुल रोड कॅनल बाजूचा रस्ता डांबरीकरण करणे. | ५५ .०० |
| २ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील कुरुल रोड ते ओद्योगिक प्रशिक्षण संस्था मोहोळ कॅनल बाजूचा रस्ता डांबरीकरण करणे | ७५ .०० |
| ३ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील दत्ता नगर ते थिटे नगर जोडणारा कॅनल वरती RCC पूल बांधणे. | ४०.०० |
| ४ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील नरखेड रोड ते घाटणे रोड कॅनलच्या दक्षिण बाजूने रस्ता डांबरीकरण करणे | ९५.०० |
| ५ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील जिजाऊ रेसिडेन्सी येथे अंतर्गत रस्ते व भूमिगत गटार बांधकाम करणे | ६१.१३ |
| ६ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील वार्ड क्र.५ मध्ये गावडेवस्ती ते नागनाथ आदलिंगे वस्ती रस्ता डांबरीकरण करणे. | ६३.७३ |
| ७ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील उजनी कॅनल ते मोहोळ शिव घाटणे रस्ता डांबरीकरण करणे | ३०.०० |
| ८ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील पालखी मार्ग गट नं.६६५ मध्ये अंतर्गत रस्ता कॉक्रीटकरण करणे. | ४०.१४ |
| ९ | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील पालखी मार्ग स्ट्रीट लाईट बसविणे | २५.०० |
| १० | मोहोळ नगरपरिषद हद्दीतील घाटणे नागचिंच मंदिर सभामंडप व पेव्हर ब्लॉक बसविणे. | १५.०० |
| | **एकूण** | **५००.००** |